पूर्णा प्रकल्पांतर्गत वसमत शाखा कालव्याच्या नांदेड उप-शाखा कालव्यावरील ७८५० मी. वरील ग्रामीण रस्ता पूल पुर्नबांधकाम करण्याचा विशेष दुरुस्ती कामास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: प्रमा-२०१८/ (प्र.क्र.४५९ /२०१८)/ सिं.व्य.(कामे)**
**मंत्रालय, मुंबई ४०००३२,**
दिनांक: १८/०१/२०१९.

**वाचा :-** १. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र जा.क्र. गोमपाविम/ता.३/नांपामं/बसमत कालवा पुल/९०७६, दि. १/१०/२०१८.
२. शासन निर्णय-२०१७/(५६६/१७)/सिंव्य (कामे),दि. ३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - संकीर्ण-२०१६/(२७/२०१६)/लपा-२ , दि.२६/०५/२०१७.
४. शासन निर्णय - संकीर्ण-२०१८/(प्र.क्र ५५१/१७)/सिंव्य(कामे) , दि.२७/११/२०१८.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त कामातील नमूद पूल हा नांदेड उप-शाखा कालव्यावर ७८५० मी. अंतरावर स्थित आहे. हा कालवा पाटबंधारे शाखा क्र.१ लिंबगांव च्या कार्यक्षेत्रात येतो. पाटबंधारे शाखा क्र.१ व अन्य ३ शाखा यांचेसाठी पाटबंधारे उपविभाग, लिंबगांव कार्यरत असून हा उपविभाग पूर्णा पाटबंधारे विभाग वसमतनगर अंतर्गत सन १९६५ पासून सिंचन व्यवस्थापनाशी निगडीत असून उपविभागाचे एकूण सिंचन क्षेत्र १४८८९ हेंक्टर आहे. तसेच या उपविभागाचे कार्यक्षेत्र तीन जिल्हयामध्ये विस्तारलेले असून (हिंगोली, परभणी व नांदेड) कालव्याची एकूण लांबी पुढील प्रमाणे आहे. वसमत शाखा कालवा - ० ते २९.३० कि.मी., नांदेड उप-शाखा कालवा - ० ते २०.१३ कि.मी., धानोरा लिंबगांव नाळेश्वर वितरीका -० ते २२.३० कि.मी. असून याच्याशी निगडीत सर्व वितरण प्रणाली द्वारे सिंचन कार्यक्रम प्रभावीपणे राबविला जातो. मुख्य कालवे व वितरणप्रणाली वरील सर्व बांधकामे साधारणपणे सन १९६० ते १९६५ कालावधी मध्ये झालेली आहे. उपरोक्त नमूद कामाच्या ठिकाणी तळणी, ता. नांदेड ते रेगांव , ता. पूर्णा , जि . परभणी जाणाऱ्या ग्रामीण रस्त्यावरील ओलांडापूल पूर्वी सन १९६५ मध्ये बांधण्यात आला असून हा पूल दगडी बांधकामात असून त्यावर संधानकातील छत टाकण्यात आलेले होते. सद्यस्थितीत या पूलाच्या आधार भिंती खालील खडक झिजून आधार भिंती खचलेल्या आहेत व मध्यभागी असलेल्या आधारस्तभांचे दगडी बांधकाम ह कमकुवत झालेले आहे. तसेच छताच्या आतील लोखंडी गज खाली बाजूने उघडे पडलेले असून गंजलेल्या स्थितीत आहेत. सदर पूल हा पूर्वी पूर्णा पाटबंधारे विभाग यांनी बांधकाम करण्यात आलेला असून कार्यकारी अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.) महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, जिल्हा परिषद प्रशासकीय इमारत परिसर, नांदेड - ४३१६०१ यांच्या कार्यक्षेत्रातील रस्ता या पूलामार्गे जात असून त्यांनी हा पूल कमकुवत झालेला असून भविष्यातील दुर्घटना टाळण्यासाठी त्याजागी नवीन पूलाचे बांधकाम करण्यासाठी या कार्यालयास लेखी कळविले आहे. या अनुषंगाने संदर्भ क्र.२, ३, व ४ येथील शासन निर्णयान्वये विभागास देण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन सदर कामाकरीता विशेष दुरुस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

पूर्णा प्रकल्पांतर्गत वसमत शाखा कालव्याच्या नांदेड उप-शाखा कालव्यावरील ७८५० मी. अंतरावरील ग्रामीण रस्ता पूल पुर्नबांधकाम करण्याचा विशेष दुरूस्तीचे कामास विस्तार व सुधारणा अंतर्गत रु.२६,६१,२१९.००/-, १% विमा खर्च रु. २६,६१२.००/- , १२% GST रु. ३,१९,९४६/- अशा **एकूण रु.३०,०७,१७७.००/- (रू.तीस लक्ष सात हजार एकशे सत्त्याहत्तर फक्त)** एवढया खर्चाच्या प्रस्तावास संदर्भ क्र.२,३ व ४ येथील शासन निर्णयान्वये विभागास दिलेल्या आधिकारान्वये व आं.वि.स. व उ.स. यांच्या सहमतीने खालील अटींच्या अधिन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१. शासन परिपत्रक क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिं.व्य.(कामे), ०१.०१.२०१५ मधील मागदर्शक सूचनांचे पालन करणे अभिलेखे ठेवणे व कार्यवाही करणे महामंडळावर बंधनकारक आहे.

२. शासन पत्र दि.०४/०६/२०१६ अन्वये तपासणी सूचीतील मुद्दे आर्थिक निकष मा. राज्यपाल यांच्या निर्देशानुसार १० % मर्यादेत निधी खर्च करणे, दायित्व निर्मिती मर्यादेत राहण्यासाठी कामाचे दोन वर्षाचे नियोजन करणे याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

३. तांत्रिक मान्यतेपूर्वी बांधकामाचे सविस्तर सर्वेक्षण व संकल्पनावर आधारित तरतूद करण्याची संपूर्ण जबाबदारी महामंडळाची राहील.

४. अंदाजपत्रकात गृहीत धरलेले आराखडे / संकल्पने दरसूची बाह्यबाबी व वहन अंतरे तपासून अंदाजपत्रकास सक्षमस्तरावर तांत्रिक मान्यता प्रदान करावी.कोणत्याही परिस्थितीत भविष्यात परिमाण वाढ वा खर्चात वाढ होणार नाही,याची खात्री करावी.

५. पाणी वापर सदस्यांना विश्वासात घेऊनच आवश्यक तरतूद करणे. प्रकल्पावरील पाणी वापर संस्थेकडे संपूर्ण लाभक्षेत्र हस्तांतरणाचे नियोजन काम सुरु करण्यापूर्वी करावे, कामे पूर्ण झाल्यानंतर संपूर्ण लाभक्षेत्र पाणी वापर संस्थेस हस्तांतरण करावे याची जबाबदारी अधीक्षक अभियंता यांची राहील.

६. माती कामे व गवत झाडे / झुडपे काढण्याची कामे जलसंपदा विभागाच्या यांत्रिकी संघटनेकडे उपलब्ध मशिनरीने करावीत.

७. प्रस्तावीत कामांमुळे खोदकाम/ तोडफोड उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

८. कामाचा खर्च उपलब्ध अनुदानातून प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत व नियोजित वेळेत पूर्ण करण्यात यावा.

९. सदरची कामे पूर्ण होईपर्यंत त्रैमासिक प्रगती अहवाल शासनास सादर करावा. काम पूर्ण झाल्यानंतर त्याबाबतचा पूर्णत्व अहवाल शासनास त्वरीत सादर करावा.

१०. विषयांकित प्रमा अंदाजपत्रकातील तरतूदी, दर , वहनअंतर ,संकल्पन व इतर तांत्रिक निकष याबाबतची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय मुख्य अभियंता व अधीक्षक अभियंता यांची राहील.

११. सदर प्र.मा. अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही. या संदर्भात प्रचलित शासन निर्णय, CWC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दत याची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०- सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूका, (१०) विस्तार व सुधारणा कार्यक्रमांतर्गत मराठवाडा प्रदेशास भाग भांडवली अंशदान (१०) (०२) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ जे १४९ ) या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/२७/२०१६/लपा-०२, दि.२६/०५/२०१७ मध्ये विहित केल्यानुसार विशेष दुरुस्ती कामांच्या खर्चाबाबतीत रू. ५.०० कोटी पर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार आं.वि.स व उ.स. यांच्या सहमतीने जलसंपदा विभागास प्रदान केले आहेत त्यानूसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिं.व्य.(कामे) कार्यासनाच्या नोंदवही क्र.१५ सन २०१८-१९ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०११८१५४८२७८६२७ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rohit Ramesh Pol

Digitally signed by Rohit Ramesh Pol
DN: CN = Rohit Ramesh Pol, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2019.01.18 15:59:23 +05'30'

**( रो र पोळ )**
**शासनाचे अवर सचिव**

**सोबतः परिशिष्ट-अ**

**प्रत :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे कार्यालय,
३) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
४) मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई,
५) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय,विधानभवन, मुंबई,
६) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद , मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई,
७) मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई,
८) मा. राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई,
१०) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,
१२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१३) कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद,
१४) मुख्य अभियंता, (जसं) जलसंपदा विभाग,औरंगाबाद
१५) आंतरवित्त सल्लागार व उपसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय, मुंबई ,
१६) अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ,नांदेड
१७) कार्यकारी अभियंता, पूर्णा पाटबंधारे विभाग ,वसमत.
१८) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

## शासन निर्णय क्रमांक: प्रमा-२०१८/ (प्र.क्र.४५९ /२०१८)/सिं.व्य.(कामे), दि.१८/०१/२०१९ चे सहपत्र

### परिशिष्ट - अ

### RECAPULATION SHEET

| SR NO | PARTICULAR | AMOUNT (Rs) |
|---|---|---|
| 1 | DISMENTALLING | 17,869.00 |
| 2 | FOUNDATION | 7,96,501.00 |
| 3 | SUB STRUCTURE | 8,59,968.00 |
| 4 | SUPER STRUCTURE | 3,44,411.00 |
| 5 | APPROACHES | 2,31,804.00 |
| 6 | OTHER ITEMS | 4,10,666.00 |
| | **TOTAL** | **26,61,219.00** |
| | Add LABOUR Insurance 1 % | 26,612.00 |
| | Add 12% GST | 3,19,946.00 |
| | **GRAND TOTAL** | **30,07,177.00** |

Rohit Ramesh Pol

Digitally signed by Rohit Ramesh Pol
DN: CN = Rohit Ramesh Pol, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2019.01.18 15:59:43 +05'30'

(रो र पोळ)
शासनाचे अवर सचिव